नगरपरिषद मुख्याधिकारी गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्या...

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एमसीओ २०१४/प्र.क्र.१९८/नवि १४**
**शिबीर कार्यालय,**
**हैद्राबाद हाऊस, नागपूर- ४४०००१**
**दिनांक : ११ डिसेंबर, २०१४**

**वाचा :-**१) शासन आदेश क्र. एमसीओ २०१४/प्र.क्र. ८४ (२)/नवि १४, दि. ०२.०८.२०१४
२) शासन आदेश क्र. एमसीओ २०१४/प्र.क्र. ८४(२)/नवि १४, दि. ०१.०९.२०१४

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ मधील कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदीनुसार खाली नमुद केलेल्या नगरपरिषद मुख्याधिकारी गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या प्रशासकीय कारणास्तव बदल्या करण्यात येत असुन त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ३ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | पदस्थापनेचे पद | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्रीमती स्वाती देशपांडे<br>मुख्याधिकारी गट-ब<br>खेड नगरपरिषद, जि. रत्नागिरी<br>(रुजू नाही) | सहायक आयुक्त, मिरा भाईंदर महानगरपालिका | संदर्भ क्र. १ येथील शासन आदेशात अंशत: बदल करुन रिक्त पदावर पदस्थापना |
| २ | श्री. जुम्मा कासम प्यारेवाले<br>मुख्याधिकारी गट-ब<br>शिंदखेडा नगरपरिषद, जि.धुळे<br>(रुजू नाही) | मुख्याधिकारी काटोल नगरपरिषद, जि. नागपूर | संदर्भ क्र. २ येथील शासन आदेशात अंशत: बदल करुन रिक्त पदावर पदस्थापना |

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | पदस्थापनेचे पद | शेरा |
|---|---|---|---|
| ३ | श्रीमती मृदुला अंडे<br>सहायक आयुक्त, ठाणे महानगरपालिका | सहायक संचालक, विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग, कोकण | रिक्त् पदावर |

०२. सर्व संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी पर्यायी अधिकारी रुजू होण्याची प्रतिक्षा न करता त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली असलेल्या व बदली झालेल्या अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच सर्व संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्या जिल्ह्यातील मुख्याधिकाऱ्यांच्या बदलीमुळे रिक्त रहाणाऱ्या नगरपरिषदांच्या मुख्याधिकारी पदाचा अतिरीक्त कार्यभार जवळपासच्या नगरपरिषद मुख्याधिकाऱ्याकडे किंवा महसुल अधिकाऱ्यांकडे सुपुर्द करुन संबंधित मुख्याधिकाऱ्यास कार्यमुक्त करावे.

०३. तसेच या आदेशान्वये करण्यात आलेल्या बदल्या रद्द करणे किंवा त्यात बदल करणे या साठी राजकीय दडपण/ दबाव आणल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित मुख्याधिकाऱ्यांविरुद्ध महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ अनुसार शिस्तभंगाची कारवाई सुरू करण्यात येईल.

०४. सर्व संबंधित मुख्याधिकाऱ्यांनी नियुक्तीच्या नवीन ठिकाणी तात्काळ रुजू होऊन तसा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

०५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२१०१७०९३४५१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=UDD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2014.12.11 12:57:36 +05'30'

**(मिलिंद कुळकर्णी)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई

२. विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, कोकण विभाग/ नागपूर विभाग
३. जिल्हाधिकारी रत्नागिरी/ धुळे/ नागपूर
४. आयुक्त, ठाणे / मिरा भाईंदर महानगरपालिका
५. अध्यक्ष, खेड नगरपरिषद, जि. रत्नागिरी
६. अध्यक्ष, शिंदखेडा नगरपरिषद, जि. धुळे
७. अध्यक्ष, काटोल नगरपरिषद, जि. नागपूर
८. सर्व संबंधित मुख्याधिकारी गट-ब

**प्रतिलिपि,**

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४. नगर विकास विभाग/ का.क्र.नवि १८ मंत्रालय, मुंबई
५. निवड नस्ती/नवि १४